(२५०)

095897 27
201504231209400527

काळसुरी तुरुंबवाडी (नवीन) खारभूमी योजना ता.म्हसळा, जि.रायगड सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्रमांक :- खाभूयो २००२/९६/(९/२००२)/ खारभूमी
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- ३०/०७/२००९.

पहावे :- १) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांचे पत्र क्रमांक ८१.०१/(८१/९९) तां-१/व पत्र क्र.८१.०१/(१/९९) तां-१/३८६८ दि.१०/११/२००५

प्रस्तावना :-

काळसुरी तुरुंबवाडी (नवीन) खारभूमी योजना ता.म्हसळा, जि.रायगड या योजनेस शासन निर्णय क्र.के एल एस १२८३/१७५/(८७७/८३) खारभूमी दि.१७.३.१९८३ अन्वये एकूण ६.३९ लक्ष किंमतीस प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. सदर योजनेच्या बांधाची लांबी १८२० मी. असून बांधाचे मातीकाम जवळजवळ पूर्ण करण्यात आले आहे. व अश्मपटलाचे काम ५० टक्के पूर्ण करण्यात आले आहे. परंतु या योजनेस सन १९९३ व १९९४ मधील अतिवृष्टीमुळे सा.क्र. १८० मी. ते ९६० मी. मधील बांधाचे मोठे नुकसान झाले असून सा.क्र.७२० मी. ते ७५० मी. मध्ये मोठी खांड पडली आहे. सदर नुकसानीची दुरूस्ती अनुदानाअभावी करण्यात आली नाही. त्यामुळे सद्यःस्थितीत सा.क्र. १५० मीटरवरील उघाडीचे पूर्णतः व सा.क्र. १७६५ मीटरवरील उघाडीचे बांधकाम अपूर्णावस्थेत आहे. दरम्यानच्या काळात सदर योजनेचा खर्च आर्थिक मापदंडात बसत नसल्यामुळे योजनेचे कोणतेही उर्वरित काम करण्यात आले नाही.

२. दरसूचीच्या दरातील वाढ, जादा दराची निविदा स्विकृती, भूसंपादन किंमतीतील वाढ, संकल्पचित्रातील बदल व इतर कारणांमुळे योजनेच्या किंमतीत वाढ संभवत असल्याने मुख्य अभियंता, पाटबंधारे विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांनी सन २००३-२००४ च्या दरसूचीतील दरांवर आधारित एकूण रूपये ८१.७३ लक्ष किंमतीचा सुधारित प्रस्ताव मान्यतेसाठी सादर केला आहे व तो शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय

काळसुरी तुरूंबवाडी (नवीन) खारभूमी योजना ता.म्हसळा, जि.रायगड या योजनेस सन २००३-२००४ च्या दरसुचीवर आधारित, प्राक्कलनानुसार कामाच्या एकूण अंदाजित रूपये ८१,७२,८४५/- (रूपये ऐक्याऐंशी लक्ष बहात्तर हजार आठशे पंच्चेचाळीस फक्त) त्यापैकी कामाप्रित्यर्थ ६५,५०,९५०/- व

G:\patil\suprama gr.doc

अनुषंगिक रू.१६,२१,८९५/- एवढया रक्कमेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. अंदाजपत्रकाचा गोषवारा सोबत जोडलेल्या विवरणपत्रात देण्यात येत आहे.

२. या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-३, मुख्य लेखाशिर्ष "४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (५०२) मृद खार जमीन योजना(१) बांधकामे योजनांतर्गत" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व त्यावरील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदरहू खारभूमी योजना प्रचलित आर्थिक मापदंडात बसत नसल्यामुळे सदर प्रस्ताव व्यय अग्रक्रम समितीच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. व्यय अग्रक्रम समितीच्या दि.२७.२.२००९ रोजी झालेल्या बैठकीमध्ये सदर खारभूमी योजनेच्या सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या प्रस्तावास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार सदरचा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. या योजनेस प्रदान करण्यात आलेली सुधारित प्रशासकीय मान्यता (५१/२००९) अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(इ.अ.इनामदार)
शासनाचे अवर सचिव

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई/नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा) मुंबई / नागपूर
वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग (१४६१), मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोंकण प्रदेश, मुंबई
आतंर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे (सोबत अंदाजपत्रक)
कार्यकारी अभियंता, खारभूमी सर्वेक्षण व अन्वेषण विभाग, पेण
उप अभियंता (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अर्थ शाखा १ /२ (२ प्रती) / लपा-१ (२ प्रती) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, रायगड
स्वीय सहाय्यक, मा.मंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहाय्यक, मा.राज्यमंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालक, मंत्रालय, मुंबई (२ प्रती)
खारभूमी कार्यासन संग्रहार्थ.

G:\patil\suprama gr.doc

शासन निर्णय क्रमांक खाभूयो २००२/९६/(९ /२००२) खारभूमी दिनांक ३०/०७/२००९ चे सहपत्र

काळसुरी तुरूंबवाडी (नवीन) खारभूमी योजना ता.म्हसळा, जि.रायगड

| अ.क्र. | बाब | एकूण रुपयात |
|---|---|---|
| १ | "ए" प्राथमिक | ४१३६२ |
| २ | "ब" (भूसंपादने) | -- |
| ३ | "सी" मुख्य कामे | ४६६०२९४ |
| ४ | "एफ" उघाडी काम | १७८७८३२ |
| ५ | "के" इमारती | १०००० |
| ६ | "एम" वृक्षारोपन | २४१७९ |
| ७ | "ओ" संकिर्ण | ५००० |
| ८ | "पी" देखभाल | १२९२३ |
| ९ | "आर" दळणवळण | ९३६० |
| | कामाप्रित्यर्थ किमत | ६५५०९५० |
| | अनुषंगिक खर्च | १६२१८९५ |
| | एकूण | ८१७२८४५ |

## ठळक वैशिष्टये

| | |
|---|---|
| पुनःप्रापित क्षेत्र | ६८ हेक्टर |
| प्रती हेक्टरी किंमत (रु.) | ११४७७५ > महत्तम मापदंड रू.१८७५० |
| लाभव्यय गुणोत्तर | २.६८ > लघुत्तम मापदंड १.०० |
| दरसूची वर्ष | २००३-०४ |

G:\patil\suprama gr.doc